**कार्यकारी अभियंता, रायगड पाटबंधारे विभाग क्र.२, कोकण भवन, नवी मुंबई अंतर्गतच्या उपविभागीय कार्यालयाच्या नियंत्रणातील बदलाबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- आढावा-२०२२/प्र.क्र.०६/आ.(पुनर्रचना),**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- ०४ मार्च, २०२२.

**वाचा:-** १) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. ईआरडब्ल्यू-१०८३/सीआर-६११/८३/एडीएम-९, दि.०८ मार्च,१९८४.
२) जलसंपदा विभाग, शासन निर्णय क्र.आढावा-२०१६/प्र.क्र.२९८/२०१६/आ.(प्रशि), दि.०७/०३/२०१७.
३) कोकण पाटबंधारे विकास महामंडळ,ठाणे जा.क्र.कोपाविम/आ-३/आढावा/६१४/ सन २०२२, दि.२३/०२/२०२२.

**प्रस्तावना:-**

कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे अंतर्गतच्या ठाणे पाटबंधारे मंडळ, ठाणे व उत्तर कोकण पाटबंधारे प्रकल्प मंडळ, कळवा-ठाणे अंतर्गतच्या बांधकाम, सर्वेक्षण-अन्वेषण व विद्युत कार्यप्रकारातील विभाग व उपविभाग कार्यालयांचे आवश्यकतेनुसार त्यांच्या नावात, कार्यप्रकारात, मुख्यालयात व मंडळीय/विभागीय नियंत्रणात बदल करुन संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये मंडळनिहाय विभाग व उपविभाग कार्यालयांच्या फेररचनेस मान्यता देण्यात आलेली आहे.

२. कार्यकारी अभियंता, रायगड पाटबंधारे विभाग, कोलाड या विभागांतर्गतचा **रायगड लघु पाटबंधारे उपविभाग, कोलाड** हे उपविभागीय कार्यालय अस्तित्वातील व बाळगंगा प्रकल्पाच्या कामांसह तसेच कार्यालयीन अभिलेख व मंजूर आस्थापनेसह उत्तर कोकण पाटबंधारे प्रकल्प मंडळांतर्गतच्या रायगड पाटबंधारे विभाग क्र.२, कोकण भवन, नवी मुंबई या विभागाच्या अधिनस्त रायगड लघु पाटबंधारे उपविभाग क्र.३, कोलाड या नावाने संलग्न करण्यात आला आहे. बाळगंगा प्रकल्पाची कामे नियोजित कालावधीत पूर्ण होण्याच्या अनुषंगाने कार्यकारी संचालक, कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे यांनी संदर्भ क्र. ३ येथील पत्रान्वये विनंती केल्याप्रमाणे सदर उपविभागाच्या नियंत्रणात बदल करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**<u>शासन निर्णय</u> :-**

कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे अंतर्गतच्या उत्तर कोकण पाटबंधारे प्रकल्प मंडळ, कळवा, ठाणे अंतर्गत रायगड पाटबंधारे विभाग क्र.२, कोकण भवन, नवी मुंबई यांच्या अधिपत्याखालील **रायगड लघु पाटबंधारे उपविभाग क्र.३, कोलाड** हा उपविभाग बाळगंगा धरणाच्या (भू-संपादन, पुनर्वसन व इतर कामे वगळून) कामांसह अधीक्षक अभियंता, ठाणे पाटबंधारे मंडळ, ठाणे अंतर्गतच्या कार्यकारी अभियंता, रायगड पाटबंधारे विभाग, कोलाड या विभागांतर्गत संलग्न करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. उपरोक्त उपविभागीय कार्यालयाच्या नियंत्रणातील बदलास खालील अटींच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे.

१. सदर उपविभागीय कार्यालयाचे मंडळीय नियंत्रण अधीक्षक अभियंता, ठाणे पाटबंधारे मंडळ, ठाणे यांच्याकडे व विभागीय नियंत्रण कार्यकारी अभियंता, रायगड पाटबंधारे विभाग, कोलाड यांच्याकडे राहील.

२. उपरोक्त बदला व्यतिरिक्त सदर उपविभागाच्या सद्याच्या रचनेत व मंजूर आस्थापनेत कोणताही बदल करण्यात आलेला नाही.

३. सदर बदलाच्या अनुषंगाने प्रशासकीय व आस्थापना विषयक खर्चात वाढ होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी, जेणेकरून शासनावर कोणताही आर्थिक भार पडणार नाही. तसेच मुदतवाढीचे प्रस्ताव सादर करताना आवश्यक ते बदल करुन प्रस्ताव शासनास सादर करावेत.

३. सदर बदलाच्या अनुषंगाने मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई यांनी आवश्यक ती सर्व कार्यवाही तात्काळ करावी.

४. शासन निर्णय, वित्त विभाग क्र. ईआरडब्ल्यू-१०८३/सीआर-६११/८३/एडीएम-९, दि.०८ मार्च,१९८४ मधील तरतूदींनुसार, संबंधित विभाग व त्यांतर्गतच्या उपविभागांकरीता आहरण व संवितरण अधिकारी व नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्याबाबत प्रदेश व संबंधित मंडळ कार्यालयाने कार्यवाही करावी. तसेच उपरोक्त प्रमाणे केलेल्या कार्यवाहीचा अनुपालन अहवाल शासनास सादर करावा.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२२०३०४१७०९०३९९२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

KAILAS VINAYAKRAO BILONIKAR

Digitally signed by KAILAS VINAYAKRAO BILONIKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9a27dfb4b6256843f8c1809ab4420a59790d825d1fe9528b0173f1603963ddb7, pseudonym=BCF91AD2CBD5640CFA1DAB00655BEAE83A361F00, serialNumber=05EE2306C341BA74D47D58063086FC4D71937218B757CE53F4397E7F31F05BFE, cn=KAILAS VINAYAKRAO BILONIKAR
Date: 2022.03.04 17:28:03 +05'30'

**( कैलास वि. बिलोणीकर )**
**सह सचिव, जलसंपदा विभाग**

**प्रत,**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा.उप मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा.मंत्री (जलसंपदा) यांचे खाजगी सचिव
५) मा. मंत्री (खारभूमी) यांचे खाजगी सचिव
६) मा.राज्यमंत्री (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक
७) मा.राज्यमंत्री (खारभूमी) यांचे स्वीय सहायक
८) मुख्य सचिव, यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
९) अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव (ज.सं.प्र. व विकास), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) सचिव (ज.सं.व्य. व लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
११) सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१२) महालेखापाल १ व २, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/ नागपूर
१३) महालेखापाल १ व २, महाराष्ट्र राज्य (लेखापरीक्षा) मुंबई/ नागपूर
१४) संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई
१५) कार्यकारी संचालक, कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे.
१६) मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई.
१७) सर्व मुख्य अभियंता व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१८) सह सचिव (सेवा)/सह सचिव (आस्था)/उप सचिव (प्रशा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१९) अधीक्षक अभियंता, ठाणे पाटबंधारे मंडळ, ठाणे.
२०) अधीक्षक अभियंता, उत्तर कोकण पाटबंधारे प्रकल्प मंडळ, कळवा-ठाणे.
२१) सर्व कार्यकारी अभियंता, जलसंपदा विभाग.
२२) कार्यकारी अभियंता, प्रशासन संगणकीकरण विभाग, पुणे.
(कार्यालयात झालेल्या बदलाची नोंद घेण्यास्तव अग्रेषित)
२३) सर्व कार्यासने, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२४) कार्यासन आस्थापना (पुनर्रचना) संग्रहार्थ.